**जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख गट-अ आणि उप अधीक्षक भूमि अभिलेख गट-ब या संवर्गातील अधिका-यांच्या "विशेष विकलांगता रजा" आणि "अध्ययन रजा" या व्यतिरिक्त इतर सर्व प्रकारच्या रजा मंजूर करण्याचे अधिकार पुन:प्रत्यायोजित <u>करण्याबाबत.......</u>**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- आस्था-२०१७/प्र.क्र.६६/ई-६**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक :- २३ मे, २०१७

**<u>वाचा</u> :-** वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अरजा-२४९३/५९/सेवा-९ दि.१६.७.१९९४

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम २७ व २९ च्या तरतुदीनुसार सदर नियमातील परिशिष्ट- एक च्या, अ.क्र.५, प्रमाणे अराजपत्रित कर्मचाऱ्यांच्या "विशेष विकलांगता रजा" आणि "अध्ययन रजा" या व्यतिरिक्त इतर सर्व प्रकारच्या रजा मंजूर करण्यासंदर्भात पूर्ण अधिकार नियुक्ती करण्यास सक्षम असणाऱ्या प्राधिकाऱ्यांना, तसेच सदर नियमातील परिशिष्ट - एक च्या अ.क्र.६, प्रमाणे व वाचा येथील वित्त विभाग शासन निर्णय क्र.अरजा-२४९३/५९/सेवा-९, दि.१६.०७.१९९४ अन्वये वर्ग-१ व वर्ग-२ च्या अधिकाऱ्यांच्याबाबतीत “अध्ययन रजा” आणि “विशेष विकलांगता रजा” या व्यतरिक्त इतर सर्व प्रकारच्या रजा मंजूर करण्यासंदर्भात पूर्ण अधिकार मंत्रालयीन प्रशासकिय विभागाचे सचिव यांना आहेत.

२. महसूल विभागाच्या नियंत्रणाखालील राजपत्रित अधिकारी यांच्या १८० दिवसांपेक्षा अधिक कालावधीच्या रजेबाबतची शासनाकडे प्राप्त होणारी प्रकरणे नियमित प्रशासकीय स्वरूपाची असतात. प्रधान सचिव (महसूल) यांच्याकडील कामाची व्याप्ती विचारात घेता, प्रशासकीय सुगमता तसेच सर्वसाधारण प्रकरणी सादरीकरणाचे टप्पे कमी करणे व प्रकरणांचा निपटारा जलदगतीने होण्याच्या दृष्टीने, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख गट-अ आणि उप अधीक्षक भूमि अभिलेख गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या "विशेष विकलांगता रजा" आणि "अध्ययन रजा" या व्यतिरिक्त १८० दिवसांपेक्षा अधिक असलेल्या सर्व प्रकारच्या रजा, सतत ५ वर्षाच्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून, मंजूर करण्याच्या प्रकरणी "मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख" म्हणून प्रधान सचिव (महसूल) यांना असलेले अधिकार जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना पुन:प्रत्यायोजित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख गट-अ आणि उप अधीक्षक भूमि अभिलेख गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या “विशेष विकलांगता रजा” आणि “अध्ययन रजा” या व्यतिरिक्त १८० दिवसांपेक्षा अधिक असलेल्या सर्व प्रकारच्या रजा, सतत ५ वर्षाच्या कमाल मर्यादेस अधिन राहून, मंजूर करण्याच्या प्रकरणी " मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख" म्हणून प्रधान सचिव (महसूल) यांना

असलेले अधिकार, जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना पुन:प्रत्यायोजित करण्यात येत आहेत.

२. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी याप्रमाणे पुन:प्रत्यायोजित अधिकारांचा वापर करुन उक्त रजा मंजूर करताना अशा रजेसंदर्भातील नियम, सर्व प्रचलित शासन निर्णय, तसेच वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांच्या अधीन राहून सदर रजा मंजूर कराव्यात.

३. उक्त अधिकारान्वये जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी एखाद्या अथवा सर्व प्रकरणी घेतलेल्या निर्णयाबाबत प्रधान सचिव (महसूल) हे " मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख" म्हणून फेर आदेश देऊ शकतील, किंवा सुधारित आदेश देऊ शकतील. तसेच अधिकारांच्या प्रत्यायोजनानंतरही त्यांचे सदर सर्व रजेच्या प्रकरणी निर्णय घेण्याचे अधिकार अबाधित राहतील.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र ११६/१७/सेवा-६ दिनांक २५.४.२०१७ च्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२३१५०६२९८६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manu Kumar Srivastava

Digitally signed by Manu Kumar Srivastava
DN: c=IN, o=All India Services, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manu Kumar Srivastava
Date: 2017.05.24 13:18:06 +05'30'

**(मनु कुमार श्रीवास्तव)**
**शासनाचे प्रधान सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राज भवन,मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.मंत्री ( महसूल ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य,पुणे
९. उप संचालक भूमि अभिलेख (मुंबई/पुणे/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/नागपूर)
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. सर्व सह सचिव/उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती (ई-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई